महानगरपालिकांमध्ये अतिरिक्त आयुक्त पदांवर निवडीने नियुक्ती करावयाच्या प्रस्तावांवर विचार करण्यास्तव विहित करण्यात आलेल्या निवडसमितीमध्ये अंशत: बदल करण्याबाबत...

महाराष्ट्र शासन
नगर विकास विभाग
शासन निर्णय क्रमांकः एमसीओ २०१५/प्र.क्र. २१८ /नवि १४
हुतात्मा राजगुरू चौक, मादम कामा मार्ग
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक: २५ जून, २०१५

**वाचा :-**

शासन निर्णय , नगर विकास विभाग, क्रमांक : एमसीओ-२०१४/प्र.क्र.२१८/नवि-१४, दि. ०६ जानेवारी, २०१५

**प्रस्तावना :-**

महानगरपालिका प्रशासन बळकट करण्यासाठी महानगरपालिका अतिरिक्त आयुक्तांची एक किंवा अधिक पदे निर्माण करणे (बृहन्मुंबई महानगरपालिका वगळून) व त्या पदांवर नियुक्ती करावयाची कार्यपध्दती संदर्भाधीन शासन निर्णयान्वये विहित करण्यात आली आहे. सदर शासन निर्णयामध्ये विहित करण्यात आलेल्या निवडसमितीमध्ये अंशत: बदल करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय:-**

अतिरिक्त आयुक्त पदावर निवडीने नियुक्तीसाठीचे प्रस्ताव विचारात घेण्यासाठी गठीत करण्यात आलेल्या समितीमध्ये खालील प्रमाणे अंशत: बदल करण्यात येत आहे.

| | |
|---|---|
| अ) प्रधान सचिव (नवि-२) | **अध्यक्ष** |
| आ) आयुक्त तथा संचालक, नगरपरिषद प्रशासन संचालनालय | **सदस्य** |
| इ) ज्येष्ठतम महानगरपालिका आयुक्त (बृहन्मुंबई महानगरपालिका वगळून) | **सदस्य** |
| ई) संबंधित महानगरपालिका आयुक्त | **सदस्य** |
| उ) उपसचिव | **सदस्य** |
| ऊ) अवर सचिव | **सदस्य सचिव** |

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०६२५१२१३४४२७२५ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.**

Milind Raghunath Kulkarni

Digitally signed by Milind Raghunath Kulkarni
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=UDD, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Milind Raghunath Kulkarni
Date: 2015.06.25 12:15:21 +05'30'

**(मिलिंद कुळकर्णी)**

शासनाचे अवर सचिव

**प्रत,**

१. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
२. मा. राज्यमंत्री (नवि) यांचे खाजगी सचिव
३. प्रधान सचिव (सेवा), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई
४. आयुक्त तथा संचालक, नगरपरिषद प्रशासन संचालनालय, वरळी, मुंबई
५. सर्व महानगरपालिकांचे आयुक्त
६. सर्व महानगरपालिकांचे महापौर
७. प्रधान सचिव (नवि-१) यांचे विशेष कार्य अधिकारी, नगर विकास विभाग, मंत्रालय
८. प्रधान सचिव (नवि-२) यांचे विशेष कार्य अधिकारी, नगर विकास विभाग, मंत्रालय
९. सर्व सह/ उप/ अवर सचिव, नगर विकास विभाग
१०. नगर विकास विभागातील सर्व कार्यासने
११. निवड नस्ती/ नवि १४